<u>मागणी क्रमांक झेड एच-५, लेखाशिर्ष ४७०२ ए ०१९</u>
पाझर तलाव क्र. ०८, लालवाडी मौजे सिरसगांव ता. बदनापूर जि. जालना. (भूसंपादन निधी)

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : भूसंपा-२०२५/प्र.क्र. १६२/जल-०४**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: १० मार्च, २०२५.

<u>वाचा</u>: १) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१४/ प्र.क्र. ४१ /भाग-१ / अ-४, दि. ०३/११/२०१६,११/०५/२०१८ व १३/०८/२०१८.
२) वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४.
३) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र क्र. प्रा.जल.अ./ लेखा-३/ भु.सं./ १९३/ सह, दिनांक २४/०१/२०२५.

**<u>प्रस्तावना</u>:** जिल्हा परिषद जालना अंतर्गत पाझर तलाव क्र.०८ लालवाडी मौजे सिरसगांव ता. बदनापूर जि. जालना या योजनेसाठी संपादीत केलेल्या जमिनीच्या भू.प्र.क्र. सीआर ०५/०९ मधील एल. ए. आर. क्र. ७१३/२०१३ मध्ये मा. दिवाणी न्यायालय (व.स्त.) जालना यांनी दिलेल्या निर्णयानुसार निधी मागणीचा प्रस्ताव संदर्भीय क्र. ३ अन्वये शासनाकडे सादर करण्यात आला आहे. वास्तविक पाहता जिल्हा परिषदांनी मंजूर केलेल्या प्रकल्पावरिल भूसंपादनाचा मोबदला त्यांनी स्वत:च्या आर्थिक स्त्रोतामधून अदा करणे आवश्यक आहे. मात्र प्रस्तुत प्रकल्पावर यापूर्वी मराठवाडा विकास कार्यक्रमांतर्गत असलेल्या योजनांना शासनाकडून निधी उपलब्ध करुन देण्यात आला असल्याने तसेच दिवाणी न्यायालयाच्या आदेशाविरुध्द वरिष्ठ न्यायालयात अपील न करण्याचे अभिप्राय असल्याने योजनेच्या लेखाशिर्षाखाली निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने प्राप्त संदर्भीय क्र. ३ येथील प्रस्तावावर वित्त विभागाचे संदर्भीय शासन निर्णयामधील सूचना विचारात घेवून खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**<u>शासन निर्णय</u>** : पाझर तलाव क्र.०८ लालवाडी मौजे सिरसगांव ता. बदनापूर जि. जालना या योजनेसाठी संपादीत केलेल्या जमीनीच्या भूसंपादन प्रकरण क्र. सीआर ०५/०९ मधील उपरोक्त न्यायालयीन प्रकरणात मागणी विवरण पत्रानुसार एकूण रुपये १.८५ लक्ष (अक्षरी रुपये एक लक्ष पंच्याऐंशी हजार फक्त ) एवढा निधी वितरित करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून याद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**अ)** वरील प्रकल्पाच्या भूसंपादनाकरिता अन्य स्त्रोतांकडून निधी उपलब्ध झाला असल्यास याद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या रक्कमांचे आहरण अथवा वितरण करण्यात येवू नये.

**ब)** तसेच भूसंपादन प्रयोजनार्थ उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या वरील निधिची गरज नसल्यास, सदर निधी कोणत्या ही परिस्थितीत परस्पर अन्य प्रयोजनार्थ वितरित करण्यात येवू नये.

**क)** कोणत्याही कारणे निधी अखर्चित राहिल्यास, सदर रक्कम तातडीने शासनाकडे प्रत्यार्पीत करावी.

**ड)** निधी वितरणासंबंधीच्या वित्त विभागाच्या संदर्भीय दिनांक २५/०७/२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकामधील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोर पालन करावे.

३. याद्वारे वितरित करण्यात आलेली रक्कम संबधित प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, छत्रपती संभाजीनगर यांनी आहरित करुन, त्यांचे अधिनस्त संबंधित जिल्हा जलसंधारण अधिकाऱ्यांकडे त्वरेने वितरित करावी.

४. यावर होणारा खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक झेड एच-५,
४७०२- लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च,
००
१०१, भूपृष्ठ जल
(०१) लहान पाटबंधारे,
(०१) (०१) लहान पाटबंधारे योजना, ० ते १०० हे.सि. क्षमता (कार्यक्रम) (४७०२ ए ०१९),
५३, मोठी बांधकामे

५. वरील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे महालेखाकार कार्यालयास सादर करुन त्याच्या प्रतिस्वाक्षरित प्रती अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे आणि शासनास सादर कराव्यात.

६. याद्वारे वितरित निधीचा ताळमेळ ठेवण्याची जबाबदारी संबंधित प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, छत्रपती संभाजीनगर यांची राहील व अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे हे सदर बाबींचे समन्वयक प्राधिकारी राहतील.

७. प्रस्तुत आदेश, प्रशासकिय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तींनुसार निर्गमित करण्यात येत असून महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२५०३१०१५१४०८५०२६ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार वा नांवाने.

RAJESH HEMCHAND BAGDE

Digitally signed by RAJESH HEMCHAND BAGDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=ed7af9a8be3d880eda8e29b769ac16864ea0732c103c7f011129ff654701c22c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7A690C5B955786C61B12D2A97A09E71E030D081D0786B3D4740E1A0078F4684, cn=RAJESH HEMCHAND BAGDE
Date: 2025.03.10 15:15:13 +05'30'

**( रा. हे. बागडे )**
**महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव**

**प्रति,**

१) अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे.
२) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, छत्रपती संभाजीनगर.

३) उपजिल्हाधिकारी भूसंपादन, जिल्हाधिकारी कार्यालय, जालना
४) उप विभागीय अधिकारी तथा भूसंपादन अधिकारी, जि. जालना.
५) जिल्हा जलसंधारण अधिकारी, लघु सिंचन विभाग, जिल्हा परिषद, जालना.
६) महालेखापाल (लेख व अनुज्ञेयता) / (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, जालना.
८) कक्ष अधिकारी (जल-११), मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९) निवड नस्ती, कार्यासन (जल-४)

**प्रत अग्रेषित,**

१) मा. विरोधी पक्ष नेता (विधान परिषद) विधानमंडळ, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२) मा. मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
३) स्थानिक लोकप्रतिनिधी (मार्फत संबंधीत लघु सिंचन (जलसंधारण) उपविभागीय अभियंता)
४) सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई. (यांचे स्वीय सहायक)
५) आयुक्त, मृद व जलसंधारण विभाग, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर.